सन २०१४-१५ या वित्तिय वर्षात रुग्णालय
तत्त्वावरील स्वयंसेवी संस्थांना सहायक
अनुदान वितरित करणेबाबत..

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः कुनिका २०१४/प्र. क्र. ५०/आरोग्य -५

मंत्रालय, मुंबई ४०००३२.
तारीख: ३१ मार्च, २०१५

**वाचा :**

१) सह संचालक, आरोग्य सेवा, (क्षय व कुष्ठ), पुणे यांचे क्र. ससंआसे/कुष्ठ व क्षय/ कक्ष- १०२/ स्वयंसेवी संस्था/४०९९-४१००/१४, दिनांक १५/२/२०१४.

२) सह संचालक, आरोग्य सेवा, (क्षय व कुष्ठ), पुणे यांचे क्र. ससंआसे/कुष्ठ व क्षय/ कक्ष- १०२/ स्वयंसेवी संस्था/८०२१-२२, दिनांक २४/३/२०१४.

३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः कुनिका२०११/प्र क्र ३२१/आरोग्य -५, दिनांक २१ मार्च, २०१२

४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/२०१३/अर्थसंकल्प-३, दिनांक ९ फेब्रुवारी, २०१५.

**प्रस्तावना :**

उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक-३ येथील शासन निर्णयानुसार रुग्णालय तत्त्वावरील कुष्ठरुग्णांसाठी रु.२,२००/- प्रमाणे प्रतीरुग्ण व दरमहा संस्थेने प्रत्यक्ष भरती केलेल्या रुग्णांप्रमाणे अनुदान देण्यात येते. याकरीता सन २०१३-१४ या वित्तिय वर्षाकरीता रुग्णालय तत्त्वावरील स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तथापि सन २०१३-१४ या वर्षात अनुदान कमी पडत असल्याने निम्नलिखित संस्थेस सन २०१४-१५ या वर्षात अनुदान मंजूर करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:**

सन २०१४-१५ या वर्षासाठी रुग्णालय तत्त्वावरील स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदाने देण्यासाठी ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली रु.२७०.०० लक्ष इतके अनुदान अर्थसंकल्पित करण्यात आले आहे. त्यापैकी २१६.०० लक्ष इतके सहायक अनुदान सह संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षय), पुणे यांच्या कार्यालयास वितरीत करण्यात आलेले आहे. सदर अनुदानातून खाली दर्शविल्याप्रमाणे स्वयंसेवी संस्थेला एकूण रु.१,०७,६००/- (रुपये एक लक्ष सात हजार सहाशे फक्त) इतके सहायक अनुदान दिनांक २१ मार्च, २०१२ च्या शासन निर्णयातील अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | संस्थेचे नाव | कालावधी | प्रत्यक्ष हजर रुग्ण | मंजूर अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | कुष्ठरोग निवारण समिती शांतीवन नेरे, जि.रायगड | सप्टेंबर २०१३ ते नोव्हेंबर २०१३ पर्यंत | ६७ | रु.१,०७,६००/- |
| | एकूण | | | रु.१,०७,६००/- |

२. सहसंचालक (क्षय व कुष्ठ), पुणे यांनी वरील अटी पूर्ण केल्याची खातरजमा करुन संबंधित संस्थांना अनुदान अदा करण्याची कार्यवाही करावी.

३. याबाबतचा खर्च मागणी क्र.आर-१, २२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य (०१)(१२) कुष्ठरोग्यांना प्रतिव्यक्ती अनुदाने देण्यासाठी सहायक अनुदाने (२२१० ०६८ ३), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५/५/२००९ नुसार वित्तीय अधिकार नियम पुस्तिका - १९७८, भाग पहिला, उपविभाग - एक ते पाच अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांमध्ये भाग पहिला, उप विभाग - एक, अनुक्रमांक ६, नियम क्रमांक ४०(१) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३११२०९२१२०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayshree Suresh Jadhav

Digitally signed by Jayshree Suresh Jadhav
DN: CN = Jayshree Suresh Jadhav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.03.31 20:10:19 +05'30'

**ज. सु जाधव**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१)महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखावअनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), मुंबई.

२)जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

४)निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई

५)संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

६)सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षय), पुणे

७)सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.

८)वित्तविभाग, (व्यय.१३) मंत्रालय, मुंबई

९)सार्वजनिक आरोग्य विभाग, (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई/१०)निवडनस्ती (आरोग्य-५)